**सन २०१८-१९ टंचाई अंतर्गत जळगांव जिल्हयातील जामनेर तालुक्यातील मौजे पाळधी येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. २१० /पापु १४**
जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १५ डिसेंबर , २०१८

<u>वाचा -</u>

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९

२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/पापु १४, दिनांक ४.५.२०१६

३) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्रमांक जा.क्र. टंचाई २०१८/प्र.क्र. ०७/१८६३५/५१८१/ वियो-२, दिनांक ०३.१२.२०१८ चे पत्र.

४) शासन पत्र क्रमांक स्थासबै-२०१८/प्र.क्र. २०१ /पापु १४, दिनांक १४ डिसेंबर, २०१८ (बैठकीचे इतिवृत्त)

<u>प्रस्तावना -</u>

विभागीय आयुक्त, नाशिक यांनी सन २०१८-१९ च्या टंचाई कालावधीसाठी तातडीच्या पाणी पुरवठा योजनेंतर्गत मौजे पाळधी, ता. जामनेर, जिल्हा- जळगांव येथील तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेचा रुपये ४४.०३ लाख किंमतीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या स्थायी समितीच्या दिनांक १४.१२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत मान्यतेसाठी विचारात घेण्यात आला.

अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या स्थायी समितीच्या दिनांक १४.१२.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत या प्रस्तावावर सविस्तर

चर्चा होऊन प्रस्तावास मंजूरी देण्यात आली. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विभागीय आयुक्त, नाशिक यांनी मौजे पाळधी, तालुका जामनेर, जिल्हा जळगांव येथील तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेला प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ३ च्या पत्रासोबत शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावात नमुद मौजे पाळधी, तालुका जामनेर, जिल्हा जळगांव येथील तात्पुरती पुरक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ४४.०३ लाख ( अक्षरी रुपये चव्वेचाळीस लाख तीन हजार फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास स्थायी समितीने दिनांक १४.१२.२०१८ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. त्या अनुषंगाने या आदेशान्वये मौजे पाळधी, तालुका जामनेर, जिल्हा जळगांव या तात्पुरत्या पुरक नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) जिल्हाधिकारी, जळगांव यांनी मौजे पाळधी तालुका जामनेर या गावांत पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण झाली असल्याचे सर्वप्रथम घोषित करावे.

२) सदर प्रस्तावात नमूद केलेली पूरक पाणी पुरवठा योजना कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगांव यांचेमार्फत राबविण्यात यावी.

३) सदर योजनेची कामे विहित पध्दतीने ई-निविदा मागविण्यात येऊन करावीत.

४) योजनेचे काम मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

५) योजनेची निविदा अल्प मुदतीची (०७ दिवस ) काढण्यास परवानगी देण्यात येत आहे.

६) निविदा प्रक्रीया दिनांक ३० डिसेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण करुन कार्यारंभ आदेश देणे आवश्यक आहे.

७) निविदा प्रक्रीया दिनांक ३० डिसेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण न झाल्यास योजनेची मान्यता रद्द समजण्यात येईल.

८) योजनेची कामे दिनांक १५ फेब्रुवारी, २०१९ पर्यंत पूर्ण करुन योजनेतून पाणी पुरवठा सुरु होणे आवश्यक आहे. तथापि, या दिनांकापर्यंत योजनेतून पाणी पुरवठा सुरु न झाल्यास योजनेची मान्यता रद्द करण्यात येईल.

९) सदर योजनेची प्रस्तावात नमूद केलेली कामे जिल्हा परिषद, जळगांव मार्फत पूर्ण करण्यात आल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती व योजनेचे व्यवस्थापन संबंधित ग्रामपंचायत मार्फत करणे आवश्यक राहील.

१०) विभागीय आयुक्त, नाशिक यांनी सदर योजनेकरिता निविदा प्रक्रिया झाल्यानंतर योजनेच्या सुरुवातीला ५०% इतका निधी द्यावा. तद्नंतर ३० % निधी विभागीय आयुक्त यांच्या स्तरावर योजनेची प्रगती विचारात घेऊन वितरीत करावा. उर्वरित २०% निधी योजना कार्यान्वित झाल्यानंतर देण्यात यावा.

११) योजनेचे काम मुदतीत पूर्ण होणे आवश्यक असल्याने योजनेच्या निविदा प्रक्रीयेपासून ते योजनेतून पाणीपुरवठा सुरु होईपर्यंत आठवडयाच्या प्रत्येक सोमवारी प्रगती अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

**२. याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीच्या पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

३. हा शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ नागरी व ग्रामीण क्षेत्रातील विहित आर्थिक व भौतिक निकषाबाहेरील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजना / उपाययोजनांना प्रशासकीय मंजूरी देण्यासाठी अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या सचिवस्तरीय स्थायी समितीच्या दिनांक १४ डिसेंबर, २०१८ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१४१७२५५७२९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

R. B. Kumatgi

Digitally signed by R. B. Kumatgi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96d578360190574be078f90f44cde8446df6e461003bf3672f18f9dbab1603da, cn=R. B. Kumatgi
Date: 2018.12.15 15:03:08 +05'30'

**(राजेंद्र कुमटगी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (नवि-२ ), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

६. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
८. विभागीय आयुक्त, नाशिक
९. जिल्हाधिकारी, जळगांव
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव
११. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, जळगांव
१२. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१३. उप सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१४. पापु १४ (निवडनस्ती)